नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ,
मुंबई यांना सन २०१३-१४ च्या खर्चावर आधारित
सन-२०१४-१५ चे उर्वरित अनुदान खर्च करण्यास
मंजुरी देण्याबाबत ....

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग,
शासन निर्णय क्रमांकः अनुदान-२०१५/प्र.क्र.२७०/१५/राकावि-२,
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, संकूल इमारत, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१,
दिनांक:- १७ ऑक्टोबर, २०१५.

वाचा :-

१) वित्त विभाग परिपत्रक क्रमांक : विअप्र -२००८/ प्र.क्र.७० /२००८,दिनांक- १५ मे, २००९.

२) शासन परिपत्रक, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अनुदान-२००९/प्र.क्र.४२ /आरोग्य-५, दिनांक :-१३ जानेवारी, २०१०.

३) सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा ( लेखा व लेखा परीक्षा ), पुणे यांचे पत्र क्र. ससंआसे / कक्ष-६४/सहाअनु/नौरोसजी/उर्वरितअनु/१४७२७/१४-१५/१५, दि.२७ जुलै, २०१५.

प्रस्तावना :-

या विभागाच्या वर उल्लेखीत शासन निर्णय दि.१३.०१.२०१० अन्वये नौरोसजी वाडीया मॅटर्निटी, परळ, मुंबई येथील रुग्णालयास शासनाकडून अनुदान मंजूर करण्याबाबत सुधारित धोरण निश्चित करण्यात आलेले असून त्यानुसार हॅास्पिटलच्या एकूण खर्चातील केवळ वेतन भत्ते व औषधावरील खर्चासाठी संस्थेला अनुदान अनुज्ञेय असून हे अनुदान एकूण खर्चाच्या ८५% मर्यादेत (पैकी ५०% राज्यशासनाचा हिस्सा व उर्वरित ५०% बृहन्मुंबई महानगरपालिकेचा हिस्सा) मंजूर केले जाते. दि. १३.१.२०१० च्या शासन निर्णयानुसार परिगणना केल्यास सन २०१३-१४ च्या खर्चावर सन २०१४-१५ या वर्षासाठी नौरोसजी वाडीया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई हया अनुदानित रुग्णालयास रू. १२,८८,७६,०५९/- एवढे अनुदान राज्य शासनाकडून देय ठरते. या रक्कमेपैकी रू.१०,०८,७९,१९१/- एवढी रक्कम नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटलला देण्यात आली असून अद्याप उर्वरित रू.२,७९,९६,८६८/- इतकी रक्कम विद्यमान आर्थिक वर्षात द्यावयाची आहे. सदर रूग्णालयास सन-२०१५-१६ मध्ये राज्य शासनाचा हिस्सा म्हणून देय असलेले अनुदान रू.७४,६७,६२७/- एवढी रक्कम वितरण प्रणालीवर उपलब्ध असून सदर रक्कम नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ या संस्थेस उपलब्ध करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नौरोसजी वाडीया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई या संस्थेस सन २०१४-१५ साठी सन २०१५-१६ च्या राज्य शासनाच्या उपलब्ध अर्थसंकल्पातून एकूण रू. ७४,६७,६२७ /- (रुपये चौऱ्याहत्तर लाख, सदुसष्ट हजार, सहाशे सत्तावीस फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्च मागणी क्र. आर-१, २२१० -वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,०१-नागरी आरोग्य सेवा- विषम चिकित्सा, ११०- ( ०३) मुफसल रूग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदाने, (०३)(०१)- अध्यापनेतर रूग्णालये व दवाखाने, यांना सहाय्यक अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने, ( २२१० ०१७३) या तपशिलवार लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ साठी बी.डी.एस. वर उपलब्ध उपलब्ध करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. नौरोसजी वाडीया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई या संस्थेस मंजूर करण्यात आलेले सदर रू. ७४,६७,६२७ /-( रुपये-चौऱ्याहत्तर लाख, सदुसष्ट हजार, सहाशे सत्तावीस फक्त ) अनुदान अदा करण्यासाठी उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. ज्या-ज्या वेळी निरिक्षणासाठी महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांना संस्थेचे हिशेब पाहिजे असतील त्या-त्यावेळी ते प्रस्तुत कागदपत्रांसहित संस्थेने सादर करावेत.

५. मंजूर नसलेल्या बाबींवरील खर्चाचा समावेश अनुदानात करण्यात आल्याचे आढळून आल्यास त्या खर्चाची एक रकमी वसुली करण्याचा अधिकार शासनास राहील. त्याकरिता वेळेचे बंधन असणार नाही.

६. हा शासन निर्णय, वित्त्त विभाग क्र.विअप्र-१००८ /प्र.क्र.७० /२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ च्या शासन निर्णयानुसार वित्तीय अधिकार नियमामध्ये करण्यात आलेल्या सुधारणाप्रमाणे वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ चा भाग पहिला,उपविभाग-एक अनुक्रमांक २७ मधील नियम क्र. १४९ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१६१२५८०५५७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sanjay Hanumant Karanjekar

Digitally signed by Sanjay Hanumant Karanjekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Hanumant Karanjekar
Date: 2015.10.17 14:59:33 +05'30'

**( सं.ह.करंजेकर )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्यसेवा सेवा संचालनालय, मुंबई,
२. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थसंकल्प व प्रशासन ), पुणे-१,
३. उप संचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे,
४. सहाय्यक संचालक, ( लेखा व सेवा परिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे,
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा ),महाराष्ट्र-१/२, मुंबई,
६. जिल्हा कोषाधिकारी, ठाणे/ पुणे,
७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
८. सहसचिव ( अर्थसंकल्प / राकावि ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुबई-१,
९. अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुबई-१,
१०.सचिव, नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई,
११.निवड नस्ती (राकावि-२), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई-१.